महाराष्ट्र राज्य सिंधी साहित्य अकादमीतर्फे नागपूर येथे स्मृतिशेष श्री. सुंदर बुटानी यांच्या जीवनावर आधारीत साहित्य विषयक कार्यशाळेच्या आयोजन खर्चास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. सिंसाअ ७२१९ (११) / प्र. क्र. २८९/सां.का.४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : १८ डिसेंबर, २०१९**

**वाचा :-** १) या विभागाचा शासन निर्णय क्र. सिंसाअ ७२१५ (१४)/प्र.क्र.२३१/सां.का.४, दिनांक १ एप्रिल, २०१६

२) महाराष्ट्र राज्य सिंधी साहित्य अकादमी यांचे क्र. मरासिंसाअ/१८६५/२०१९ दिनांक ०२ डिसेंबर, २०१९

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य सिंधी साहित्य अकादमीमार्फत सिंधी साहित्याच्या सर्वांगीण उन्नतीसाठी व विकासासाठी राबवावयाच्या योजनांची नियमावली उपर्निर्दिष्ट संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेली आहे. सदर नियमावलीतील लोकसाहित्य व सांस्कृतिक कार्यक्रम या योजनेअंतर्गत महाराष्ट्र राज्य सिंधी साहित्य अकादमी मार्फत, नागपूर येथे स्मृतिशेष श्री. सुंदर बुटानी यांच्या जीवनावर आधारीत साहित्य कार्यशाळेच्या आयोजन खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयान्वये नागपूर येथे आयोजित होणा-या स्मृतिशेष श्री. सुंदर बुटानी यांच्या जीवनावर आधारीत साहित्यिक कार्यशाळेचे आयोजन करण्याकरिता रुपये १,७२,०००/- (रुपये एक लाख बहात्तर हजार फक्त) इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशील | प्रस्तावित खर्च |
|---|---|---|
| १ | हॉल भाडे | २०,०००/- |
| २ | ध्वनी, प्रकाश व्यवस्था | ८,०००/- |
| ३ | छायाचित्रण | ५,०००/- |
| ४ | सहभागी प्रबंध सादरकर्ते यांचा प्रवास खर्च (२ x ३०००) | ६,०००/- |
| ५ | सहभागी प्रबंध सादकर्ते यांचे मानधन ( ६ x ३०००) | १८,०००/- |
| ६ | निवास व्यवस्था | २०,०००/- |
| ७ | अल्पोपहार व भोजन व्यवस्था | ३०,०००/- |
| ८ | सांस्कृतिक कार्यक्रम ( २ अंक नाट्य) | ४०,०००/- |
| ९ | शाल, मानचिन्ह, पुस्तक खरेदी | १०,०००/- |
| १० | निमंत्रणपत्रिका, बॅनर छपाई | १०,०००/- |
| ११ | संकीर्ण (इतर अनुषंगिक खर्च) | ५,०००/- |
| | **एकूण रुपये - -** | **१,७२,०००/-** |

२. उपरोक्त खर्च लेखाशीर्ष मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, (०९) सिंधी अकादमी, (०९) (०१) सिंधी साहित्य अकादमीची आस्थापना (कार्यक्रम), (२२०५ १६९७) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखालील सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून मंजूर करण्यात यावा.

३. यासाठी, सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी यांना नियंत्रण अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर खर्चास वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/विनियम भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ उपविभाग ३, नियम २७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मान्यता देण्यात येत आहे.

५. तसेच सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१९/प्र.क्र. ९२/अर्थ-३, दिनांक ८ जुलै, २०१९ मधील परिच्छेद क्र. ७, १४, १५ आणि १६ ची पूर्तता होत असून उर्वरित सर्व परिच्छेद व परिशिष्टातील उर्वरित अटी या प्रकरणी लागू होत नाही.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१९१२२०१२३८५२२६२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Vilas Ramrao Thorat

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6cc4d20348a52de465c7c34a61591bbe69b747ae11457103a0cfb9a57fc6ce6, serialNumber=cb03c92b399cc89310bf1378c184d97a4b7b9b98e926ea8e71dd7bc9cb273631, cn=Vilas Ramrao Thorat
Date: 2019.12.20 12:48:53 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. सहसंचालक तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य सिंधी साहित्य अकादमी, मुंबई
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
७. महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१०. निवड नस्ती, सां.का.४